**मृद व जलसंधारण विभागातील उल्लेखनीय कामगिरी करणाऱ्या अभियंत्यांना वैयक्तिक पुरस्कार देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**मृद व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक आस्थाप-२०२४/प्र.क्र.२७३/जल-२**
हुतात्मा राजगुरु चौक,मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक: २० मे, २०२५

**वाचा :-** १. शासन निर्णय, मृद व जलसंधारण विभाग क्र.आस्थाप २०१६/प्र.क्र.८८ (भाग-९)/जल-२, दि.३१ मे, २०१७

**प्रस्तावना :-**

मृद व जलसंधारण विभागांतर्गत साखळी सिमेंट नाला बांध, नाला खोलीकरण व रूंदीकरण करणे, जुन्या जलसंरक्षणांचे पुनर्जीवन करणे, अस्तित्वातील लघु पाटबंधारे संरचनांची (केटी वेअर/साठवण बंधारा) यांची दुरूस्ती करणे, पाझर तलाव, लघु सिंचन तलाव दुरूस्ती व नुतनीकरण व क्षमता पुर्नस्थापित करणे, पाणलोट विकासाची कामे इ. कामे करण्यात येतात. सदर कामांची/संरचनांची संकल्पना तयार करून व इतर उपकरणांचा/संगणकांचा वापर करून संकल्पचित्रे व कामांचे सविस्तर आराखडे बनविताना अभियंत्यांचे कौशल्य पणाला लागते व त्यामुळे अशा अभियत्यांची सेवा समाजपयोगी ठरते. सबब, अशा तांत्रिक संवर्गातील अभियंत्यांचे प्रशासकीय व तांत्रिक कौशल्य विचारात घेऊन त्यांचा वैयक्तिक पुरस्कार देऊन गौरव करण्याचा या विभागाचा विचार आहे. भारतरत्न, सर विश्वेश्वरय्या यांचा १५ सप्टेंबर हा जन्मदिवस दरवर्षी “अभियंता दिन” म्हणून साजरा केला जातो. त्यानिमित्ताने मृद व जलसंधारण विभागांतर्गत कार्यरत व उल्लेखनीय कामगिरी केलेल्या अभियंत्यांना पुरस्कार देऊन त्यांचा गौरव करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मृद व जलसंधारण विभागातील तांत्रिक संवर्गातील गट “अ” व “ब” मधील अभियत्यांनी प्रशासकीय व तांत्रिक कौशल्य पणाला लावून शासकीय कामात दाखविलेल्या नैपुण्याबद्दल व कामात गतिमानता आणण्यासाठी केलेल्या प्रयत्नांबद्दल भारतरत्न, सर विश्वेश्वरय्या यांच्या १५ सप्टेंबर या जन्मदिवशी दरवर्षी त्यांना वैयक्तिक पुरस्कार देऊन गौरव करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. सदरचे पुरस्कार हे सन २०२४-२५ या वर्षापासून दरवर्षी प्रदान करण्यात येतील. या अनुषंगाने अवलंबवयाची कार्यपद्धती पुढीलप्रमाणे आहे :

**१) पुरस्काराचे स्वरूप :-**

पुरस्कार हा प्रशस्तीपत्र व सन्मानचिन्हाच्या स्वरूपात देण्यात यावा.

**२) कोणत्या संवर्गातील अधिकारी/कर्मचाऱ्यांना देण्यात यावा :-**

a) तांत्रिक संवर्गातील वर्ग "अ" (उदा. प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, जिल्हा जलसंधारण अधिकारी, उपविभागीय जलसंधारण अधिकारी)

b) तांत्रिक संवर्गातील वर्ग "ब" (उदा. जलसंधारण अधिकारी (राजपत्रित/अराजपत्रित))

**३) पुरस्कारांची महत्तम संख्या :-**

पुरस्कारांची संख्या खाली दर्शविल्याप्रमाणे राहील :

**a) गट- "अ" :**

१. प्रादेशिक जलसंधारण अधिकारी - १

२. जिल्हा जलसंधारण अधिकारी - १

३. उपविभागीय जलसंधारण अधिकारी -१

**b) गट "ब" :**

१. जलसंधारण अधिकारी (राजपत्रित) (शाखा अभियंता/सहायक अभियंता श्रेणी-२) - २

२. जलसंधारण अधिकारी (अराजपत्रित) (कनिष्ठ अभियंता) - २

**४) शिफारस करण्याची कार्यपद्धती :**

**आयुक्त, मृद व जलसंधारण यांचे स्तरावर शिफारस समिती पुढीलप्रमाणे असेल :**

| | |
|---|---|
| १) आयुक्त, मृद व जलसंधारण, छ.संभाजीनगर | - अध्यक्ष |
| २) अप्पर आयुक्त जलसंधारण, मृद व जलसंधारण प्रादेशिक क्षेत्र, पुणे व नागपूर | - सदस्य |
| ३) प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण नाशिक/अमरावती/ठाणे | - सदस्य |
| ४) उपायुक्त (प्रशासन), मृद व जलसंधारण आयुक्तालय, छ.संभाजीनगर | - सदस्य सचिव |

**गट- "अ" -**

**१. प्रादेशिक जलसंधारण अधिकारी/प्रादेशिक दक्षता व गुणनियंत्रण अधिकारी/अधीक्षक अभियंता तथा पदसिद्ध उप सचिव या संवर्गातील अधिकाऱ्यांना पुरस्कार देणेबाबतची कार्यपद्धती -**

या संवर्गातील अधिकाऱ्यांनी या शासन निर्णयासोबत जोडलेल्या "**नमुना -१**" प्रमाणे इच्छुकता अर्ज आयुक्त, मृद व जलसंधारण यांचे अध्यक्षतेखालील शिफारस समितीकडे पुरस्कारासाठी थेट सादर करावा.

**२. जिल्हा जलसंधारण अधिकारी (स्थापत्य) व अन्य समकक्ष पदे या संवर्गातील अधिकाऱ्यांना पुरस्कार देणेबाबतची कार्यपद्धती -**

सर्व प्रादेशिक जलसंधारण अधिकारी यांनी जिल्हा जलसंधारण अधिकारी (जि.प + राज्य स्तर) यंत्रणेतील प्रत्येकी २ अधिकाऱ्यांचा प्रस्ताव संबंधित अपर आयुक्त जलसंधारण, पुणे/नागपूर यांच्याकडे सादर करावा. अपर आयुक्त, नागपूर व पुणे यांनी छाननी समितीद्वारे छाननी करून अनुक्रमे २ व ४ अधिकाऱ्यांची नावे, शिफारस समितीस सादर करावी.

**३. उपविभागीय जलसंधारण अधिकारी (स्थापत्य) गट-अ व अन्य समकक्ष पदे या संवर्गातील अधिकाऱ्यांना पुरस्कार देणेबाबतची कार्यपद्धती -**

सर्व प्रादेशिक जलसंधारण अधिकारी यांनी त्यांच्या अधिनस्त कार्यालयातील (जि.प + राज्य स्तर) यंत्रणेतील उपविभागीय जलसंधारण अधिकारी (स्थापत्य), या संवर्गातील कमाल ६ अधिकाऱ्यांचा प्रस्ताव संबंधित अपर आयुक्त यांच्याकडे सादर करावा. अपर आयुक्त, नागपूर व पुणे यांनी छाननी समितीद्वारे छाननी करून अनुक्रमे ४ व ८ अधिकाऱ्यांची नावे शिफारस समितीस करावी.

**गट- "ब" -**

**४. जलसंधारण अधिकारी (स्थापत्य) गट-ब (राजपत्रित) (शाखा अभियंता/सहायक अभियंता श्रेणी-२) (जि.प + राज्य स्तर) या संवर्गातील अधिकाऱ्यांना पुरस्कार देणेबाबतची कार्यपद्धती -**

सर्व जिल्हा जलसंधारण अधिकारी (जि.प + राज्य स्तर) यांनी जलसंधारण अधिकारी (शाखा अभियंता/सहायक अभियंता श्रेणी-२) (जि.प + राज्य स्तर) यंत्रणेतील प्रत्येकी १ अधिकाऱ्यांची शिफारस/प्रस्ताव संबंधित प्रादेशिक जलसंधारण अधिकारी यांच्याकडे सादर करावा. प्रादेशिक जलसंधारण अधिकारी यांनी सदर प्रस्तावांची त्यांचे स्तरावर छाननी समिती गठीत करून, त्याद्वारे छाननी करून ४ नावांची शिफारस अपर आयुक्त कार्यालयामार्फत शिफारस समितीकडे सादर करावी.

**५. जलसंधारण अधिकारी (स्थापत्य) गट-ब (अराजपत्रित) (कनिष्ठ अभियंता) (जि.प + राज्य स्तर) या संवर्गातील अधिकाऱ्यांना पुरस्कार देणेबाबतची कार्यपद्धती -**

सर्व जिल्हा जलसंधारण अधिकारी (जि.प + राज्य स्तर) यांनी जलसंधारण अधिकारी (कनिष्ठ अभियंता) (जि.प + राज्य स्तर) यंत्रणेतील प्रत्येकी २ अधिकाऱ्यांची शिफारस/प्रस्ताव संबंधित प्रादेशिक जलसंधारण अधिकारी यांच्याकडे सादर करावा. प्रादेशिक जलसंधारण अधिकारी यांनी सदर प्रस्तावांची त्यांचे स्तरावर छाननी समिती गठीत करून, त्याद्वारे छाननी करून ६ नावांची शिफारस अपर आयुक्त कार्यालयामार्फत शिफारस समितीकडे सादर करावी.

**५)	शिफारस समितीने शासन स्तरावरील अंतिम निवड समितीकडे सादर करावयाच्या संवर्गनिहाय शिफारशी :**

| **अ.क्र.** | **संवर्ग** | **शासन स्तरावरील निवड समितीस शिफारस करावयाच्या अधिकाऱ्यांची संख्या** |
|---|---|---|
| १ | प्रादेशिक जलसंधारण अधिकारी/प्रादेशिक दक्षता व गुणनियंत्रण अधिकारी/अधीक्षक अभियंता तथा पदसिद्ध उपसचिव (स्थापत्य) | ०२ |
| २ | जिल्हा जलसंधारण अधिकारी (स्थापत्य) व अन्य समकक्ष पदे | ०४ |
| ३ | उपविभागीय जलसंधारण अधिकारी (स्थापत्य) गट-अ व अन्य समकक्ष पदे | ०८ |
| ४ | जलसंधारण अधिकारी (स्थापत्य), गट-ब (राजपत्रित) (सहायक अभियंता श्रेणी-२/शाखा अभियंता) | १२ |
| ५ | जलसंधारण अधिकारी (स्थापत्य), गट-ब (अराजपत्रित) (कनिष्ठ अभियंता) | २४ |

**६)	पुरस्कारासाठी अंतिम निवड करावयाची कार्यपद्धती :**

उपरोक्त परिच्छेद क्र.४ मध्ये नमूद आयुक्त, मृद व जलसंधारण, छ.संभाजीनगर यांच्या अध्यक्षतेखालील शिफारस समितीच्या शिफारशी प्राप्त झाल्यानंतर, सदर नावांमधून पुरस्कार देण्यासाठी अंतिम अभियंत्यांच्या नावांची शासनाला शिफारस करण्यासाठी शासन स्तरावर एक **अंतिम निवड समिती** गठीत करण्यात येत असून त्या समितीत खालील अधिकाऱ्यांचा समावेश असेल :-

१)	सचिव/प्रधान सचिव/अपर मुख्य सचिव	- अध्यक्ष
२)	आयुक्त, मृद व जलसंधारण, छ. संभाजीनगर	- सदस्य
३)	मुख्य अभियंता तथा पदसिद्ध सहसचिव, मंत्रालय, मुंबई	- सदस्य
४)	सह/उप सचिव (जल-२)	- सदस्य
५)	अवर सचिव/कक्ष अधिकारी (जल-२)	- सदस्य सचिव

सदर निवड समिती क्षेत्रीय कार्यालयाकडून प्राप्त शिफारशी तपासून अंतिम निवड यादी तयार करून शासन मान्यतेसाठी सादर करेल.

**७) एखाद्या संवर्गात पुरस्कारासाठी पात्र अधिकारी व्यक्ती न आढळल्यास करावयाची कार्यवाही -**

एखाद्या संवर्गात पुरस्कारासाठी पात्र अधिकारी व्यक्ती न आढळल्यास त्या संवर्गातील अभियंत्याचे नाव सुचविण्याची आवश्यकता नाही.

**८) पुरस्कारासाठी निकष :-**

१. अधिकाऱ्यांची/ कर्मचाऱ्यांची मागील ५ वर्षांची गोपनीय अहवालाची प्रतवारी अतिउत्कृष्ट / उत्कृष्ट असावी. (गट-अ व गट-ब मधील अधिकारी यांची वर्षनिहाय प्रतवारी अपर आयुक्त जलसंधारण यांनी प्रमाणित करून प्रस्तावासोबत पाठवावी.)

२. ज्या वर्षी १५ सप्टेंबर या “अभियंता दिन” रोजी पुरस्कार प्रदान करावयाचे असतील, संबंधित अधिकाऱ्याने कार्यरत पदावर, त्यापूर्वीच्या आर्थिक वर्षाअखेरीस किमान ३ वर्ष सलग काम केलेले असावे. सदर कालावधीमध्ये शिथीलता देण्याचे अधिकार शासन स्तरावरील अंतिम निवड समितीस राहतील.

३. सचोटी व चारित्र्य उत्तम असावे.

४. विभागीय चौकशी प्रलंबित / प्रस्तावित नसावी. तसेच पूर्वी शिक्षा झालेली नसावी.

५. वक्तशीरपणा व कामाचा निपटारा

६. प्रशासकीय कौशल्य, कामातील गतिमानता, नाविन्याची आवड.

७. संगणकीकरणातील योगदान

८. शासकीय खर्चात काटकसर / बचत व शासकीय उत्पन्न / महसूल वाढीसाठीचे योगदान.

९. शासनाची प्रतिमा उंचाविण्यासाठी वैयक्तिकरित्या केलेले प्रयत्न/ योगदान.

१०. कायमस्वरुपी बचत याबाबत संबंधित अधिकारी व कर्मचाऱ्याने दाखविलेले वैयक्तिक व विशेष कौशल्य आणि बजावलेली भूमिका.

११. सर्वसामान्य जनता / लोकप्रतिनिधी यांच्याकडून येणाऱ्या मागण्या, विविध कामासंदर्भात प्राप्त झालेल्या तक्रारी याबाबत वेळीच केलेली कार्यवाही, तसेच प्रशासन अधिक लोकाभिमुख विकासात्मक व गतिमान होण्यासाठी आणि लोकांचा विकास हे ध्येय डोळयासमोर ठेवून त्यानुसार कामात दाखविलेली कार्यतत्परता, कार्यक्षमता इ. बाबींचा विचार व्हावा.

१२.पारंपरिक पद्धतीने काम न करता नव्या कल्पनांचा अविष्कार किंवा प्रगटीकरण करुन सामाजिक, आर्थिक व राज्याच्या दृष्टीने व्यापक विचार करुन समाजाच्या हिताच्या दृष्टीने निर्णय घेण्यामध्ये दाखविलेली आवड आणि रुची.

१३.सोपविलेले काम गुणवत्तपूर्वक, चिकित्सकपणे, परिपूर्ण आणि बारकाईने अभ्यास करुन दर्जेदार पद्धतीने व निःपक्षपातीपणे प्रकरण सादर करण्याची कार्यशैली व हातोटी आणि त्यामुळे निर्णय प्रक्रिया सुलभ होण्यासाठी केलेले खास प्रयत्न.

१४.वर्षभरात राबविलेला प्रकल्प किंवा केलेले वैशिष्टयपूर्ण काम

२. सदरचे पुरस्कार अदा करण्यासाठी येणारा खर्च **लेखाशिर्ष २४०२ए११२, ००, ००१,** संचालन व प्रशासन, (०१) सर्वसाधारण आस्थापना, (०१) (०१) आयुक्त, मृद व जलसंधारण, छत्रपती संभाजीनगर यांची आस्थापना (अनिवार्य), १३, कार्यालयीन खर्च, अंतर्गत खर्ची टाकण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०२५०५२०१११४५४३६२६** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by PANDIT KHANDERAO JADHAV
Date: 2025.05.20 11:16:03 +05'30'

**( पंडीत जाधव )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल महोदय यांचे सचिव राजभवन, महाराष्ट्र राज्य.
२. मा. मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय,मुंबई
३. मा.उप मुख्यमंत्री महोदयांचे सचिव, मंत्रालय,मुंबई
४. मा.मंत्री, मृद व जलसंधारण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
५. मा.राज्यमंत्री, मृद व जलसंधारण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
६. सचिव, (मृद व जलसंधारण) यांचे स्वीय सहायक.
७. आयुक्त, मृद व जलसंधारण, छत्रपती संभाजीनगर
८. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र जलसंधारण महामंडळ, छ.संभाजीनगर
९. महासंचालक, वाल्मी, छ.संभाजीनगर
१०.अपर आयुक्त जलसंधारण, मृद व जलसंधारण प्रादेशिक क्षेत्र, पुणे/नागपूर
११.प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग (सर्व)

१२.प्रादेशिक दक्षता व गुणनियंत्रण अधिकारी, दक्षता व गुणनियंत्रण पथक, पुणे/ छ.संभाजीनगर/नागपूर
१३.जिल्हा जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, (सर्व)
१४.जिल्हा जलसंधारण अधिकारी, जिल्हा परिषद (ल.पा.) विभाग, (सर्व)
१५.उपविभागीय जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण उपविभाग, (सर्व)
१६.उपविभागीय जलसंधारण अधिकारी, जिल्हा परिषद (ल.पा.) उपविभाग, (सर्व)
१७.निवड नस्ती जल-२

**शासन निर्णय क्र.आस्थाप-२०२४/प्र.क्र.२७३/जल-२, दि.२०/०५/२०२५ सोबतचा "नमुना - १"**

| | | |
|---|---|---|
| १ | अधिकाऱ्याचे नाव (संपूर्ण) | |
| २ | जन्म तारीख | |
| ३ | कार्यरत असलेले ठिकाण | |
| ४ | कार्यरत पदावर नियमितपणे केलेली शासकीय सेवा | |
| ५ | मागील ५ वर्षांची गोपनीय अहवालाची प्रतवारी (वर्ष निहाय प्रतवारी शिफारस समितीने प्रमाणित करून प्रस्तावासोबत पाठवावी.) | |
| ६ | सचोटी व चारित्र्य | |
| ७ | विभागीय चौकशी प्रलंबित / प्रस्तावित आहे किंवा कसे ? तसेच पूर्वी शिक्षा झालेली आहे काय? | |
| ८ | वक्तशीरपणा व कामाचा निपटारा | |
| ९ | प्रशासकीय कौशल्य, कामातील गतिमानता, नाविन्याची आवड (उदाहरणासहीत) | |
| १० | कार्यरत पदावर असताना केलेले उल्लेखनीय काम/कामे | |
| ११ | संगणकीकरणातील योगदान. | |
| १२ | शासकीय खर्चात काटकसर / बचत व शासकीय उत्पन्न / महसूल वाढीसाठीचे योगदान. (उदारणासहीत) | |
| १३ | शासनाची प्रतिमा उंचाविण्यासाठी वैयक्तिकरित्या केलेले प्रयत्न/ योगदान. | |
| १४ | कायमस्वरुपी बचत याबाबत संबंधित अधिकारी व कर्मचाऱ्याने दाखविलेले वैयक्तिक व विशेष कौशल्य आणि बजावलेली भूमिका. | |
| १५ | सर्वसामान्य जनता / लोकप्रतिनिधी यांच्याकडून येणाऱ्या मागण्या, विविध कामासंदर्भात प्राप्त झालेल्या तक्रारी याबाबत वेळीच केलेली कार्यवाही, तसेच प्रशासन अधिक लोकाभिमुख विकासात्मक व गतिमान होण्यासाठी आणि लोकांचा विकास हे ध्येय | |

| | | |
|---|---|---|
| | डोळयासमोर ठेवून त्यानुसार कामात दाखविलेली कार्यतत्परता, कार्यक्षमता इ. | |
| १६ | पारंपरिक पद्धतीने काम न करता नव्या कल्पनांचा अविष्कार किंवा प्रगटीकरण करुन सामाजिक, आर्थिक व राज्याच्या दृष्टीने व्यापक विचार करुन समाजाच्या हिताच्या दृष्टीने निर्णय घेण्यामध्ये दाखविलेली आवड आणि रुची. | |
| १७ | सोपविलेले काम गुणवत्तपूर्वक, चिकित्सकपणे, परिपूर्ण आणि बारकाईने अभ्यास करुन दर्जेदार पद्धतीने व निःपक्षपातीपणे प्रकरण सादर करण्याची कार्यशैली व हातोटी आणि त्यामुळे निर्णय प्रक्रिया सुलभ होण्यासाठी केलेले खास प्रयत्न. | |
| १८ | उल्लेखनीय कामासंदर्भात वृत्तपत्रात तसेच मा.लोकप्रतिनिधी यांनी केलेले विशेष कौतुक | |
| १९ | वर्षभरात राबविलेला प्रकल्प किंवा केलेले वैशिष्टयपूर्ण काम | |

**संबंधित अधिकाऱ्याची स्वाक्षरी व पदनाम**